मंत्रालयातील शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या नूतनीकरणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**

**शासन निर्णय क्र.नूतनीकरण-२०१७/प्र.क्र.१०/नोंदणी शाखा**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय (विस्तार) मुंबई - ४०० ०३२.

दिनांक :- ३० जून, २०१८.

वाचा:-

१. शासन परिपत्रक, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११.०४.२०१८
२. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक-अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८
३. कार्यकारी अभियंता, इलाखा शहर विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे पत्र क्र.इशवि/प्रशा/द/४५५०, दि.०९.०४.२०१८
४. कार्यकारी अभियंता, दक्षिण विद्युत विभाग, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांचे पत्र जा.क्र.काअ/दमुंविवि/स्विय/१७७१/२०१८, दि.०३.०५.२०१८

**प्रस्तावना :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालयाच्या विस्तारित इमारतीमध्ये चौथ्या मजल्यावर कार्यरत आहे. सदर कार्यालयाची रचना व फर्निचर अतिशय जूने झालेले आहे. कार्यालयातील वातावरण व सोयीसुविधा चांगल्या दर्जाच्या असल्यास कर्मचाऱ्यांच्या कामावर निश्चितच चांगला परिणाम होऊन कार्यक्षमता वाढण्यास मदत होणार आहे. त्या अनुषंगाने विभागाच्या मंत्रालयातील, विस्तारित इमारतीतील, दालन क्र. ४१३, ४१५, ४१७,४१९, ४३२, ४३४, ४३६,४३८,४४० व ४४३ तसेच दालन क्र.४४६,४४७ व ४५९ या दालनांच्या बैठक रचनेचे नूतनीकरण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, विस्तारित इमारत, मंत्रालय, मुंबई येथील विभागाच्या दालन क्र. ४१३, ४१५, ४१७,४१९, ४३२, ४३४, ४३६,४३८,४४० व ४४३ तसेच दालन क्र.४४६,४४७ व ४५९ विस्तार येथील अधिकारी व कर्मचाऱ्यांच्या बैठक रचनेचे नूतनीकरण करण्यासाठी रु. १,९४,३२,९४७/- (अक्षरी रुपये एक कोटी चौऱ्याण्णव लक्ष बत्तीस हजार नऊशे सत्तेचाळीस फक्त) इतक्या रकमेस आणि वातानुकूलित यंत्रासह विद्युतीकरणासाठी रु.१७,१८,२८९/- (अक्षरी रुपये सतरा लक्ष अठरा हजार दोनशे एकोणनव्वद फक्त) अशा एकूण रु.२,११,५१,२३६/- (अक्षरी रुपये दोन कोटी अकरा लक्ष एकावन्न हजार दोनशे छत्तीस मात्र) इतक्या रकमेस सार्वजनिक बांधकाम विभागाने नमूद केलेल्या खालील अटींच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

अ) सदर कामाच्या बांधकामाचा खर्च शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या उपलब्ध असलेल्या नियतव्ययातून करण्यात यावा.

ब) सदर अंदाजपत्रक, अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी तसेच शालेय शिक्षण व क्रीडा विभागाच्या अधिकाऱ्याने साक्षांकीत करणे आवश्यक आहे.

क) सदर कामाच्या अनुषंगाने तांत्रिक मंजूरी देताना, वारंवारितेनुसार साहित्याच्या आवश्यक सर्व चाचण्या करुन घेण्याची बाब संबंधितांनी विचारात घेणे आवश्यक राहील.

ड) Dismantled Materials मधून निघणाऱ्या उपयुक्त साहित्याबाबत सार्वजनिक बांधकाम विभागाच्या प्रचलित पद्धतीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

इ) मंजूर राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दरास संबंधित अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ यांनी मंजूरी देताना शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दि.११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर बाबींकरिता होणारा खर्च " मागणी क्रमांक ई-४, ४२०२, शिक्षण, क्रीडा, कला व संस्कृती यावरील भांडवली खर्च, (०१) सर्वसाधारण शिक्षण, २०२ माध्यमिक शिक्षण, (००) (०४), शिक्षण उपसंचालक व शिक्षण विभागाच्या कार्यालय इमारतीचे बांधकाम, (४२०२ ६२२८) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व विभागास मंजूर असलेल्या सन २०१८-२०१९ या वर्षाच्या आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा.

याकरिता विभागातील सह/उपसचिव (प्रशासन) यांना नियंत्रण अधिकारी आणि अवर सचिव/कक्ष अधिकारी (लेखा शाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ मधील भाग एक उपविभाग पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, वित्त विभाग व नियोजन विभागाच्या सहमतीने आणि वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.५०१ व ५०२/व्यय-५, दि.०१.०६.२०१८, अनौपचारिक संदर्भ क्र.१०० व १०१/अर्थ-८, दि.०४.०६.२०१८ आणि नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१२७/१४७५ व १२८/१४७१, दि.०८.०६.२०१८ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६३०१५०१४८३३२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Departrment, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d,
serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.06.30 15:07:40 +05'30'

**(र.प्र.आटे)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई -३२
२. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. महालेखापाल, १ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई-३२
५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई-३२.
६. वित्त विभाग/व्यय-५/अर्थ-८, मंत्रालय, मुंबई-३२.
७. लेखाशाखा, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८. सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९. निवड नस्ती (नोंदणीशाखा).